**केंद्रीय मार्ग निधी अंतर्गत 'सेतुबंधन' उपक्रमाची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र : रेउपु-२०२२/प्र.क्रं.४४/नियो-१अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २८/०२/२०२३

**वाचा:-** १. केंद्रीय रस्ते परिवहन व राजमार्ग मंत्रालयाचे पत्र क्र.D.O.No.२००५, दि.०६.०५.२०२२
२. शासनाचे पत्र क्रं.रेउपु-२०२२/प्र.क्रं.४४/नियो-१अ दि.१४.०७२०२२; दि.२२.०७.२०२२; दि.०२.०९.२०२२.
३. शासनाचे पत्र क्रं.रेउपु-२०२२/प्र.क्रं.४४ (भाग-२)/नियो-१अ, दि.१६.११.२०२२
४. मुख्य अभियंता (केंद्रीय रस्ते परिवहन व राजमार्ग मंत्रालय), क्षेत्रीय कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रं.RO/MUM/MAH/CRIF-ROB/SETU-BANDHAN/२०२२३२३/५१०९ दि.०७.०२.२०२३

**प्रस्तावना:-**

राज्यामध्ये जवळपास २४५० रेल्वे क्रॉसिंग्स अस्तित्वात आहेत. रेल्वे क्रॉसिंगच्या ठिकाणी वाहतुकीस होणारे अडथळे तसेच अपघात टाळण्याच्या दृष्टीकोनातून रेल्वे क्रॉसिंग दरम्यान जाणा-या रस्त्यावर रेल्वे उड्डाणपुलांची निर्मिती करण्याच्या दृष्टीने ज्या ठिकाणी रेल्वे क्रॉसिंगवरील वाहतुक १ लाख टी.व्ही.यु. पेक्षा जास्त असेल अशा ठिकाणी उड्डाणपुलासाठी ५०:५० टक्के या प्रमाणात रेल्वे व राज्य शासनामार्फत निधी उपलब्ध करण्यात येतो. तथापि, केंद्र शासनाच्या 'सेतु बंधन' या उपक्रमांतर्गत ज्या ठिकाणी रेल्वे क्रॉसिंगवरील वाहतुक १ लाख टी.व्ही.यु. पेक्षा कमी आहे व अद्याप रेल्वेमार्फत मंजूर करण्यात आलेले नाही अशा रेल्वे क्रॉसिंगच्या ठिकाणी रेल्वे उड्डाणपूल/भूयारी मार्ग यांचे बांधकाम करण्यात येणार आहे. सदर उपक्रमांतर्गत रेल्वे उड्डाणपुल/भुयारी मार्गाच्या बांधकामाचा संपूर्ण खर्च हा केंद्र शासनामार्फत उपलब्ध केला जाणार असून राज्य शासनाने केवळ आवश्यक भूसंपादन व सेवावाहिन्यांचे स्थलांतर यासाठी लागणारा खर्च करावयाचा आहे. त्यामुळे राज्य शासनाची मोठ्या प्रमाणात आर्थिक बचत होणार आहे. प्रस्तुत उपक्रमाच्या अंमलबजावणीमुळे केंद्र शासनाच्या निधीतून राज्यात रेल्वे उड्डाणपुलांच्या सोयीसुविधा उपलब्ध होवून वाहतूकीच्या समस्या तसेच रेल्वे क्रॉसिंगच्या ठिकाणी होणारे अपघात कमी होण्यास मदत होणार आहे. सदरील बाब विचारात घेता 'सेतुबंधन' या उपक्रमाची अंमलबजावणी करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्रीय मार्ग निधी या योजनेंतर्गत प्राप्त निधीतून 'सेतुबंधन' उपक्रम राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. सदर उपक्रमांतर्गत निकषपात्र रेल्वे उड्डाणपुल/रेल्वे भुयारी मार्गाची कामे करण्यात येतील.

**अ) योजनेची उद्दिष्टे:-**

१. राज्यातील रेल्वे उड्डाणपुल/भूयारीमार्गांची कामे हाती घेण्यास प्रोत्साहन देणे.
२. रेल्वे क्रॉसिंगच्या ठिकाणी होणा-या अपघाताचे प्रमाण कमी करून रस्ता सुरक्षेस हातभार लावणे.

**ब) योजनेची व्याप्ती व निकष:-**

१. सदर उपक्रमांतर्गत राज्यातील रस्त्यांवरील (ग्रामीण रस्ते व प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेंतर्गत समाविष्ट रस्ते वगळून) अस्तित्वातील रेल्वे क्रॉसिंगच्या ठिकाणी रेल्वे उड्डाणपूल/भुयारी मार्गाचे बांधकाम करण्यात येईल.

२. सदर उपक्रमांतर्गत ज्या ठिकाणी रेल्वे क्रॉसिंगवरील वाहतुक १ लाख टी.व्ही.यु. पेक्षा कमी आहे व अद्याप रेल्वेमार्फत मंजूर करण्यात आलेले नाही अशा रेल्वे क्रॉसिंगचा समावेश करण्यात येईल.

३. केंद्र शासनाच्या संदर्भीय पत्र क्रं.४ च्या पत्रान्वये एकूण २५ रेल्वे उड्डाणपुल/भूयारी मार्गाची कामे सेतुबंधन उपक्रमांतर्गत पहिल्या टप्प्यामध्ये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात हाती घेण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यापैकी ११ रेल्वे उड्डाणपुल सार्वजनिक बांधकाम विभाग, ०९ उड्डाणपुल महानगरपालिका, १ उड्डाणपुल ग्राम विकास विभाग तर ४ उड्डाणपुल राष्ट्रीय महामार्ग यांच्या अखत्यारीत आहे. सबब सेतुबंधन उपक्रमाच्या पहिल्या टप्प्यामध्ये २५ रेल्वे उड्डाणपूल/भुयारी मार्गाची कामे हाती घेण्यात येतील.

४. सेतुबंधन प्रकल्पांतर्गत रेल्वे उड्डाणपुलांचे बांधकाम हे 'महाराष्ट्र रेल इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कॉ.लि.' (महारेल) या यंत्रणेकडून करण्यात येईल.

५. रेल्वे उड्डाणपुल/भुयारी मार्गाच्या बांधकामाबाबत राज्य शासन व महाराष्ट्र रेल इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कॉ.लि. (महारेल) यांचेमध्ये करण्यात आलेल्या दि.२०.०७.२०२१ च्या सामंजस्य करारातील तरतूदी सदर कामांकरीता लागू राहतील.

६. राज्यातील सर्व रेल्वे उड्डाणपूल/भुयारी मार्गांकरीता अंमलबजावणी यंत्रणा सा.बां.विभाग असली तरी सदर बांधकामाच्या अनुषंगाने येणारा भूसंपादन व सेवावाहिनी स्थलांतराबाबतचा खर्च हा संबंधित सार्वजनिक बांधकाम विभाग, नगरविकास विभाग व ग्रामविकास विभाग यांनी करावयाचा आहे.

**क) योजनेच्या मार्गदर्शक सूचना:-**

१. रेल्वे उड्डाणपूल/भुयारी मार्गाच्या कामाबाबत भूसंपादन व सेवा वाहिन्यांचे स्थलांतरण याकरीता निधी राज्य शासनाने उपलब्ध करावयाचा आहे.

२. बांधकामासाठीचा खर्च केंद्रीय मार्ग निधी या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून स्वतंत्रपणे उपलब्ध करण्यात येईल.

३. रेल्वे उड्डाणपुल/भूयारीमार्गाच्या पोहचरस्त्याचे काम राज्य शासनाने करावे तर मूळ उड्डाणपुलाची कामे रेल्वे मंत्रालयाच्या निरीक्षणाखाली करण्यात येईल.

४. रेल्वेच्या कार्यकक्षेतील पुलाच्या देखभाल दुरूस्तीची जबाबदारी रेल्वे विभागाची राहील.

५. सदर उपक्रमांतर्गत रेल्वे उड्डाणपुल/ भूयारी मार्गाच्या रस्ते व पोहोच रस्त्यांच्या देखभाल दुरूस्तीची जबाबदारी राज्य शासनाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०२२८१७१६००७६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SACHIN MANIKRAO CHIVATE

Digitally signed by SACHIN MANIKRAO CHIVATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=40AE84322C80D3E4EA1B574EB3782ED6CB133B938933BDF197ED5A1551D8622A, cn=SACHIN MANIKRAO CHIVATE
Date: 2023.02.28 17:20:50 +05'30'

**( सचिन चिवटे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.

३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. अ.मु.स. (नियोजन), यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. अ.मु.स. (वित्त), यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. अ.मु.स., सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

९. अ.मु.स., ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१०.अ.मु.स., नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

११. अ.मु.स., गृह (परिवहन) विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.

१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र रेल इन्फ्रास्ट्रक्चर डेव्ह. कॉर्पो. लि. (MRIDCL), मुंबई

१६. उप सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.

१८. निवडनस्ती-कार्यासन (नियोजन-१अ).